मौजे निळा व मौजे महागांव, ता.पुर्णा, जि.परभणी या अतिवृष्टीने बाधित गावातील प्रशासकीय मान्यता प्राप्त पाणीपुरवठा या नागरी सुविधा कामांकरिता निधी मंजूरीबाबत...

महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-२०१८/प्र.क्र.६०/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीखः १७/०७/२०१८

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस ११०५/प्र.क्र.२३९/म-३, दि.९.१.२००६

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस ११०५/प्र.क्र.२३९/म-३, दि.२.६.२००६

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आव्यप्र २०१५/प्र.क्र.६२/आव्यप्र-२, दि.१७.११.२०१५

४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५

५) जिल्हाधिकारी, परभणी यांचे कार्यालयीन पत्र क्र.२०१८/पुनर्वसन/कावी-१३३, दि.५.३.२०१८

६) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र.एफएलडी-२०१८/प्र.क्र.६०/र-१२, दि.२९.५.२०१८

७) जिल्हाधिकारी, परभणी यांचे कार्यालयीन पत्र क्र.२०१८/पुनर्वसन/कावी-२९१, दि.२७.६.२०१८

प्रस्तावना -

मौजे निळा व मौजे महागांव, ता.पुर्णा, जि.परभणी ही गावे सन २००५ च्या अतिवृष्टीने बाधित झाली असून, या गावांतील पाणी पुरवठा या नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र.३ च्या आदेशान्वये शासन स्तरावर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. प्रशासकीय मान्यतेनुसार निधी मागणी प्रस्ताव जिल्हाधिकारी, परभणी यांच्या कार्यालयाने दि.५/३/२०१८ रोजीच्या संदर्भाधीन क्र.५ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता. तथापि, सदर मागणी विहित प्रपत्रामध्ये नसल्यामुळे, कामनिहाय तपशीलासह विहित प्रपत्रामध्ये प्रस्ताव सादर करण्याबाबत शासनपत्र दि.२९/५/२०१८ रोजीच्या संदर्भाधीन क्र.६ अन्वये कळविण्यात आले. त्यास अनुसरुन जिल्हाधिकारी, परभणी यांच्या कार्यालयाने दि.२७/६/२०१८ रोजीच्या संदर्भाधिन क्र.७ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांच्या अनुषंगाने प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय -

तदनुषंगाने, मौजे निळा व मौजे महागांव, ता.पुर्णा, जि.परभणी गावांमधील नागरी सुविधा कामांसाठी निविदा स्विकृत किंमतीनुसार प्रत्यक्ष झालेल्या कामाच्या मर्यादेत एकूण रू.१,१२,९६,३४६/- निधी सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तद्नुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, मौजे निळा व मौजे महागांव, ता.पुर्णा, जि.परभणी गावांमधील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.१,१२,९६,३४६/- (रुपये एक कोटी बारा लक्ष शहाण्णव हजार तीनशे शेहेचाळीस फक्त ) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) इतर, (९३)(०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधा यांवरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ ०९८८) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्यामार्फत जिल्हाधिकारी, परभणी यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) जिल्हाधिकारी, परभणी यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, जिल्हाधिकारी, परभणी यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) इतर, (९३)(०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधा यांवरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ ०९८८) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) इतर, (९३)(०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधा यांवरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ ०९८८) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

(७) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

(८) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

(९) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१७१७००१३६५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.07.17 17:01:24 +05'30'

(द.शं.मुंजाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. जिल्हाधिकारी, परभणी.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी
६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
७. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२
८. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी म-११/ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवडनस्ती र-१२, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

***

**शासन निर्णय क्र.एफएलडी-२०१८/प्र.क्र.६०/र-१२, दि.१७/०७/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**परभणी जिल्ह्यातील पुर्णा तालुक्यातील प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.**

| अ क्र | अतिवृष्टीने बाधित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रुपयात) |
|---|---|---|---|
| १) | मौजे निळा | पाणी पुरवठा | ५५,३६,५३५/- |
| २) | मौजे महागांव | पाणी पुरवठा | ५७,५९,८११/- |
| | | **एकूण** | **१,१२,९६,३४६/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.07.17 17:01:40 +05'30'

( द.शं.मुंजाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन